**मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीमधून**
**अर्थसहाय्य मंजूर करणेबाबत.**
**अभिनव युवा बहुउद्देशीय संस्था, जवखेडे,**
**ता. अमळनेर, जि. जळगाव**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक-सीसीएफ-२०२३/प्र.क्र.३०३/अर्थसं**

मुख्य इमारत, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च, २०२४.

**वाचा -**

१) सामान्य प्रशासन विभाग ,शासन निर्णय, , क्र. पीडीसी-१०६९-१३५१४-बी, दि. २७/०८/१९६९.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. पीडीसी-१०६९/१३५१४-बी, दि. ०८/१०/१९७०.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.सीसीएफ-२०१४/प्र.क्र.८८/२०१४/२५, दि.१७/९/२०१९.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन शुद्धीपत्रक, क्र.सीसीएफ-२०१४/प्र.क्र.८८/२०१४/२५, दि.२४/११/२०२२.

**शासन निर्णय -**

मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीचे संपूर्ण नियंत्रण, व्यवस्थापन व प्रशासन मा. मुख्यमंत्री महोदय यांच्याकडे निहीत आहे. मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीमधून महाराष्ट्र – कर्नाटक सीमावर्ती भागातील ८६५ गावे यासह महाराष्ट्र राज्यातील सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, धर्मादाय किंवा तत्सम सार्वजनिक किंवा निम सार्वजनिक संस्था किंवा संघटना यांना, या निधीतून मा.मुख्यमंत्री यांच्या स्वेच्छानिर्णयानुसार अर्थसहाय्य देण्यात येते. त्यानुसार मा. मुख्यमंत्री यांच्या मान्यतेने '**अभिनव युवा बहुउद्देशीय संस्था, जवखेडे, ता. अमळनेर, जि. जळगाव, संचलित श्री. गुरूदत्त प्रायमरी इंग्लिश स्कूल, जवखेडे या शाळेचे बांधकाम करणे करीता**' रुपये ३०,००,०००/- (अक्षरी रुपये तीस लक्ष फक्त) इतके अर्थसहाय्य याद्वारे मंजूर करण्यात येत आहे.

२. '**अभिनव युवा बहु उद्देशीय संस्था, जवखेडे, ता. अमळनेर, जि. जळगाव**' **संचलित** '**श्री. गुरूदत्त प्रायमरी इंग्लिश स्कूल, जवखेडे या शाळेचे बांधकाम करणे करीता**' यासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे. संस्थेस ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी सदर निधी संस्थेने एका वर्षात खर्च करावा आणि खर्चाच्या अनुषंगाने "सनदी लेखापाल" (Chartered

Accountant) यांनी प्रमाणित केलेले उपयोगिता प्रमाणपत्र निधी प्राप्त झाल्यानंतर एक वर्षात सादर करावे. तसेच सदर संस्थेने नियमानुसार लेखापरिक्षण करुन घेऊन लेखापरिक्षण अहवाल देखील शासनास सादर करावा.

**३.** सदर निधी वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१०१०/प्र.क्र.६८/कोषा प्र-५, दि.१८ एप्रिल, २०११ मधील तरतुदीस अनुसरुन मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीच्या स्वीयप्रपंजी (PLA) लेखा खात्यामध्ये आजमितीस उपलब्ध असलेल्या रकमेमधून **'अभिनव युवा बहुउद्देशीय संस्था, जवखेडे, ता. अमळनेर, जि. जळगाव'** या संस्थेच्या बँक ऑफ बडोदा, शाखा- मण्डल, जिल्हा- जळगांव, खाते क्र. २२२७०१००००९५९३ मध्ये विहीत कार्यपद्धतीनुसार जमा करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय संदर्भाधीन दि. २७/०८/१९६९, दि ८/१०/१९७०, दि. १७/०९/२०१९ आणि दि.२४/११/२०२२ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार मा. मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१६१११७१०४००७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

POONAM APPASAHEB NIKAT

Digitally signed by POONAM APPASAHEB NIKAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=4244125d615d0ed721459edc809359f4ab75dd3e50a5a0a9a8c65e19e76ee1c5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D685FEFE26CBBD0A3DD72ECF2724309E44D5F2DB33F88465536810293EEA17B2, cn=POONAM APPASAHEB NIKAT
Date: 2024.03.16 11:26:19 +05'30'

(पूनम निकत)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई

३) महालेखापाल, महाराष्ट्र (१/२), लेखा व अनुज्ञेयता, मुंबई / नागपूर

४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

५) निवासी लेखाधिकारी, मुंबई,

६) उप सचिव (कोषा प्र-५/ अर्थ-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

७) अध्यक्ष, अभिनव युवा बहुउद्देशीय संस्था, जवखेडे, ता. अमळनेर, जि. जळगाव.

८) निवडनस्ती. (का-अर्थसं)